**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः कअनि-१११८/प्र.क्र. १/१४ ब.**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मुंबई -४०००३२

दिनांक: ०८ जून, २०१८

**संदर्भ** : १) या विभागाचे समक्रमांक दिनांक २५.०५.२०१८ चे आदेश

२) सा.प्र.वि. शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१४, दिनांक ०९.०८.२०१६

३) सा.प्र.वि. शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१८६/१६/१४, दिनांक २३.१२.२०१६

**शासन आदेश**

संदर्भाधीन क्रमांक १ येथील आदेशान्वये बदली अधिनियम, २००५ अंतर्गत मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीने पदस्थापना करण्यात आल्या आहेत. सदर आदेशातील काही कक्ष अधिकाऱ्यांच्या बदलीस मुदतवाढ/स्थगिती/रद्द करण्याची विनंती विभागास प्राप्त झाली आहे. या विनंत्या अमान्य करण्यात येत आहेत तसेच त्यानुसार पुढील तक्त्यामध्ये नमूद कक्ष अधिकाऱ्यांना संदर्भाधीन क्रमांक २ व ३ येथील शासन परिपत्रक/ शासन निर्णयाच्या अनुषंगाने त्यांच्या नावासमोरील रकाना क्रमांक ४ येथील विभागातून रकाना क्रमांक ५ येथील बदलीच्या विभागात रुजू होण्यासाठी दिनांक ११.०६.२०१८ (म.पू.) पासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

| अ. क्र. | श्री/ श्रीमती | कक्ष अधिकारी नाव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री | रा.वि.कुंडले | वैद्यकिय शिक्षण | **शालेय शिक्षण** |
| २ | श्री | फा.अ.नु.पठाण | अल्पसंख्याक विकास विभाग | **गृहनिर्माण विभाग** |
| ३ | श्री | वि.र.परमार | अल्पसंख्यांक विकास विभाग | **शालेय शिक्षण विभाग** |
| ४ | श्री | स.रा.उत्तेकर | सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग | **उच्च व तंत्रशिक्षण विभाग** |
| ५ | श्री | सु.दे.आंबेकर | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | **मृद व जलसंधारण विभाग** |
| ६ | श्री | सु.सि.पाटील | आदिवासी विकास विभाग | **महसुल व वन विभाग** |
| ७ | श्रीमती | स.रा.देशपांडे | ग्रामविकास विभाग | **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग** |

संबंधित कक्ष अधिकाऱ्यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागात दिनांक ११.०६.२०१८ (म.पू.) रूजु व्हावे. सदरचे आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून संबंधित विभागांनी स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही.

म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ चे नियम १२ मधील तरतुदीनुसार उपरोक्त तक्त्यात नमूद कक्ष अधिकाऱ्यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय नसल्याने, ते जर त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागात तत्काळ रूजू झाले नाहीत तर, त्यांच्या अनुपस्थितीचा कालावधी सेवाखंड धरण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६११११२३२२०३७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.06.11 12:33:56 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित कक्ष अधिकारी, मंत्रालय, मुंबई

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
३. सह/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. निवडनस्ती.